महाराष्ट्र कृषि सेवेतील अधिक्षक कृषि अधिकारी, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांना कृषि सह संचालक, गट-अ पदावर निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः आकृवि २४२०/प्र.क्र.१७५ /१५अे
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई -३२.
तारीख: ३० डिसेंबर, २०२१.

संदर्भ :- १. सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. ईएसबी-११२१/प्र.क्र.१०५/१३, दि. १२/११/२०२१.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि. ०७/०५/२०२१.
३. कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. आकृवि २०१९/प्र.क्र.१०/१५-अे, दि.१६/०३/२०२०

## शासन निर्णय :-

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये केलेल्या शिफारशीनुसार अधिक्षक कृषि अधिकारी, गट-अ (वेतनश्रेणी S-२३ : ६७७००-२०८७००) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना कृषि सह संचालक, गट-अ (वेतनश्रेणी S-२५ : ७८८००-२०९२००) या संवर्गात सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्ये.क्र. | अधिका-याचे नांव व पदनाम | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २६ | श्री. संजय रंगराव पाटील,<br>प्रकल्प संचालक (आत्मा), ठाणे. | विभागीय कृषि सह संचालक, ठाणे<br>(रिक्त पदी) |
| २ | २७ | श्री. बसवराज गुरण्णापा बिराजदार,<br>प्रकल्प व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे | विभागीय कृषि सह संचालक, कोल्हापूर<br>(रिक्त पदी) |
| ३ | ३० | श्री. अशोक हनमंतप्पा किरनळ्ळी,<br>प्राचार्य (रामेती) खोपोली, रायगड. | कृषि सह संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे (रिक्त पदी) |
| ४ | ३१ | श्री. किसन शामराव मुळे,<br>अधिक्षक कृषि अधिकारी (दक्षता पथक), पुणे. | विभागीय कृषि सह संचालक, अमरावती<br>(रिक्त पदी) |
| ५ | ३३ | श्री. पोपट संदिपान शिंदे,<br>अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना, औरंगाबाद. | कृषि सह संचालक (नियोजन व अंदाजपत्रक) कृषि आयुक्तालय, पुणे.<br>(रिक्त पदी) |
| ६ | ३५ | श्री. संतोष बाबाराव आळसे,<br>प्रकल्प संचालक (आत्मा), परभणी. | सहसंचालक, डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन, अकोला. (रिक्त पदी) |
| ७ | ४० | श्री. अंकुश मारोती माने,<br>जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, ठाणे. | कृषि सहसंचालक (विस्तार व प्रशिक्षण-२), कृषि आयुक्तालय, पुणे. (रिक्त पदी) |
| ८ | ४१ | श्री. काशिनाथ भाऊसाहेब तरकसे,<br>जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पालघर. | कृषि सहसंचालक (विस्तार व प्रशिक्षण-१), कृषि आयुक्तालय, पुणे. (रिक्त पदी) |

**२.** उपरोक्त अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

(अ) सदर पदोन्नती ही मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र. २७९७/२०१५ मध्ये दि. ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ वरील मा. सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

(आ) रिट पिटीशन स्टॅम्प नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५/०५/२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

(इ) सदर पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरूपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

**३.** उपरोक्त अधिकाऱ्याने त्यांचा सध्याच्या पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे.

**४.** आयुक्त (कृषि ), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३०१६०९१७९५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2021.12.30 16:09:49 +05'30'

**(सरिता बांदेकर-देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
१२. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१३. संचालक, वसंतराव नाईक कृषि व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर.
१४. सर्व सह सचिव/उप सचिव ( कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. उप सचिव (का.१३/ का.१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. सर्व विभागीय कृषि सह संचालक/अधिक्षक कृषि अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१७. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
१८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१९. सर्व संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
२०. निवड नस्ती /१५अे